# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग
**शासन ज्ञापन क्र.बांधका-०१२१/प्र.क्र.१७५/पोल-७.**

मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई - ४०००३२.
दिनांक : - १३ फेब्रुवारी, २०२५

**विषय** :- घोडेगांव पोलीस स्टेशन येथील पोलीस अधिकारी व अंमलदार यांचेकरीता निवासस्थाने बांधकामाबाबत रु.१५,६१,३०,३७७/- इतक्या खर्चाचे सुधारित अंदाजपत्रक व नकाशे यास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

**संदर्भ** :- १. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/प्र.क्र.४९/१४/विनियम, दि ०५.०१.२०१५.
२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. २०.०९.२०१९.
३. शासन परिपत्रक, सा.बां. विभाग, क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि. २५.०९.२०१९.
४. कार्यकारी अभियंता, सा.बां.(उत्तर) विभाग, पुणे यांचे पत्र क्र. प्रशा/घोडेगाव/५३५१/२०२१, दि. २४.०६.२०२१.
५. शासन ज्ञापन क्र.बांधका-०१२१/प्र.क्र.१७५/पोल-७, दि. ३०.०६.२०२१
६. पोलीस महासंचालक, म.रा., यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.पोमसं/ २७/घोडेगांव शासकीय निवा.बांधकाम/ पुणे ग्रामिण/१४/२०२४, दि.१६.०५.२०२४.
७. पोलीस अधिक्षक, पुणे ग्रामीण यांचे पत्र जा. क्र. पशा-६/मंचर पो. स्टे. इमारत सु. निधी/१४४४६२९/२०२४, दि.१४.१०.२०२४.

**प्रस्तावना :-**

पोलीस अधिक्षक, पुणे ग्रामीण यांच्या अधिपत्याखालील घोडेगांव येथे पोलीस अधिकारी व कर्मचारी यांच्या निवासस्थान बांधकामासाठी यापूर्वी संदर्भ क्र. ४ अन्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने संदर्भ क्र. ५ येथील दि.३०.०६.२०२१ च्या ज्ञापनान्वये रु.१४.०६ कोटी इतक्या खर्चाचे अंदाजपत्रक व नकाशे यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

आता संदर्भ क्र.६ अन्वये पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्या कार्यालयाने पोलीस अधिक्षक, पुणे ग्रामीण यांच्या अधिपत्याखालील घोडेगांव येथे पोलीस अधिकारी व कर्मचारी यांच्या निवासस्थान बांधकामासाठी रु.१५.६२ कोटी इतक्या खर्चाचे सुधारित अंदाजपत्रक व नकाशे यास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार सदर प्रस्तावास सुधारित मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन ज्ञापन :-**

पोलीस अधिक्षक, पुणे ग्रामीण यांच्या अधिपत्याखालील घोडेगांव येथे पोलीस अधिकारी व कर्मचारी यांच्या निवासस्थान बांधकामासाठी दि.३०.०६.२०२१ च्या ज्ञापनान्वये रु.१४.०६ कोटी इतक्या खर्चाचे अंदाजपत्रक व नकाशे यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. त्यानुसार सदरचे काम कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (उत्तर) विभाग, पुणे यांचेमार्फत करण्यात येत आहे. प्रत्यक्ष काम

करत असताना इमारत बांधकामाच्या जागेत बदल झाल्यामुळे उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ, पुणे यांचेकडून दि.२८.०१.२०२२ च्या पत्रान्वये सुधारित वास्तुमांडणी आराखडा घेण्यात येवून त्यानुसार प्रस्तावित इमारत "क" या इमारतीच्या जमीन पातळीत व इमारत "अ" आणि "ब" या इमारतींच्या जमीन पातळीमध्ये जास्त तफावत असल्याने त्यानुसार इमारत "क" च्या जागेमध्ये बदल झाल्यामुळे तसेच वस्तू व सेवाकर १२% वरून १८% झाल्याने सदर रक्कम देखील वाढणार असल्याचे नमूद करुन विहित्त मुद्दयांच्या अनुषंगाने पोलीस अधिक्षक, पुणे ग्रामीण यांनी माहिती सादर केलेली आहे. सबब, सदर कामाकरिता वाढीव कामकाजामुळे अंदाजपत्रकात वाढ झाली असल्याने सुधारित खर्चाच्या वाढीव रकमेस प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत संदर्भ क्र. ६ नुसार प्रस्ताव प्राप्त झाला आहे.

२. उक्त सुधारित खर्चाचे अंदाज हे उपविभागीय अभियंता, सा.बां. उपविभाग क्र.१, घोडेगाव, जि. पुणे यांनी सन २०२१-२०२२ व सन २०२२-२३ च्या दरसूचीनुसार तयार केले असून ते कार्यकारी अभियंता, (सा.बां.) उत्तर विभाग, पुणे, अधीक्षक अभियंता, सा.बां. मंडल, पुणे यांनी स्वाक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज हे मुख्य अभियंता, सा.बां. प्रादेशिक विभाग, पुणे यांनी तपासले असून ते रु.१५,६१,३०,३७७/- कोटी असे अंतिम करुन प्रतिस्वाक्षारित केले आहेत आणि प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यास सहमती दिली आहे.

४. त्यानुसार, पोलीस अधीक्षक, पुणे (ग्रामीण), यांच्या आस्थापनेवरील घोडेगांव पोलीस स्टेशन येथील पोलीस अधिकारी व अंमलदार यांचेकरीता निवासस्थाने बांधकामाबाबत रु.१५,६१,३०,३७७/- (रुपये पंधरा कोटी एकसष्ठ लाख तीस हजार तीनशे सत्याहत्तर फक्त) इतक्या खर्चाच्या सुधारित अंदाजपत्रकास खालील नमुद बाबींकरिता त्याखाली नमुद अटी व शर्तीच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | कारणे | मूळ परिणाम | सुधारित परिणाम | प्राप्त प्र. मा. नुसार येणारी किंमत | सु. प्र. मा. नुसार येणारी किंमत | वाढ | घट | टक्केवारी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | निवासस्थान इमारत अ. ब. क. व पाणी पुरवठा | २८५१ चौ.मी. | २८५१ चौ.मी. | ७,३१,५४,१०७ | ७,८९,३४,८५९ | ५७,८०,७५२ | ० | ७.९०% |
| २. | गौण खनिज व टेस्टिंग चार्जेस | ० | १ | ० | १०,१५,५५२ | १०,१५,५५२ | ०.०० | ०.००% |
| ३. | बायोडायजेस्टर | १ | ० | १३,००,००० | ०.०० | -१३,००,००० | १३,००,००० | -१००% |
| ४. | सीमा भित व प्रवेशद्वार | ४६५ मी. | ४५० मी. | ५८,५९,००० | ५३,९५,९२५ | -४,६३,०७५ | ४,६३,०७५ | -७.९०% |
| ५. | अंतर्गत रस्ते | १५०० चौ. मी. | २०५० चौ. मी. | २७,००,००० | ७४,२८,१७२ | ४७,२८,१७२ | ०.०० | १७५.१२% |
| ६. | जुन्या इमारती पाडणे | १ | १ | ११,९५,०६५ | १४,०५,९५१. | २,१०,८८६ | ० | १७.६५% |
| ७. | संरक्षक भिंत | ८५ मी | ९७ मी | ३३,१५,००० | ८३,४३,०९० | ५०,२८,०९० | ०.०० | १५१.६८% |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ८. | रेन वॉटर हार्वेस्टिंग | १ | १ | ११,१६,७०० | ७,१४,००० | -४,०२,७०० | ४,०२,७०० | -३६.०६% |
| ९. | भूमिगत पाण्याची टाकी, बांधिव गटर | १ | १ | ५७,००,००० | ५७,०२,९४८ | २,९४८ | -२,९४८ | ०.०५% |
| १०. | जमीन सुधारणा व बाग बगिचा काम | ११९५ चौ.मी. | १८५० चौ.मी. | ६,४९,७०० | २४,३०,३२५ | १७,८०,६२५ | ० | २७४.०७% |
| | **विद्युतीकरण** | | | | | | | |
| ११. | अंतर्गत | १ | १ | ३६,३८,७२१ | ३६,३८,७२१ | ० | ० | ०.००% |
| १२. | बाह्य | १ | १ | ४३,६६,४६६ | ४३,६६,४६६ | ० | ० | ०.००% |
| १३. | फायर फायटींग | १ | १ | ४५,४१,७६० | ४५,४१,७६० | ० | ० | ०.००% |
| १४. | पंप हाऊस | १ | १ | ५,००,००० | ५,००,००० | ० | ० | ०.००% |
| १५. | सी.सी.टी.व्ही. | १ | १ | ५,००,००० | ५,००,००० | ० | ० | ०.००% |
| १६. | सोलर वॉटर | १ | १ | १२,००,००० | १२,००,००० | ० | ० | ०.००% |
| १७. | आकस्मिक खर्च | १ | १ | ३५,३५,८०३ | ० | -३५,३५,८०३ | ३५,३५,८०३ | -१००% |
| १८ | वस्तू व सेवा कर लेबर इन्शुरन्स | १२% | १८% | १,३७,१७,०६५ | २,२१,००,००० | ८३,८२,९३५ | ० | ६१.११% |
| १९ | भाव वाढ | १ | १ | १,०९,७३,६५२ | ५५,६८,५४१ | -५४,०५,१११ | ५४,०५,१११ | -४९.२६% |
| २०. | सल्लागार शुल्क | १ | १ | २१,९४,७३० | ३,००,००० | ० | ० | ०.००% |
| २१. | सल्लागार शुल्कावर वस्तू व सेवा कर | १ | १ | ३,९५,०५१ | | | | ०.००% |
| २२ | अतिरिक्त बाबी | | | ० | २३,५२,१५३ | २३,५२,१५३ | ० | ०.००% |
| २३ | **एकूण रक्कम** | १ | १ | १४,०५,५२,८२० | १५,६१,३०,३७७ | १,८१,७५,४२४ | १,११,०३,७४१ | ---- |

१) सुधारित बांधकामाचा नमुना नकाशा, मांडणी नकाशा आणि विस्तृत नकाशा यांना वास्तुशास्त्र तज्ञाकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.

२) उक्त कामासाठी रु.१५.६१,३०,३७७/- इतक्या रकमेच्या सा.बां. प्रादेशीक विभाग, पुणे यांनी दिलेल्या, यासोबतच्या जोडपत्रातील सुधारित “Recapitulation Sheet” मधील विवरणानुसार काम करावे.

३) कामाच्या निविदा मागविण्याच्या आधी सा.बां. विभागाच्या सक्षम प्राधिका-याची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक आहे.

४) प्रत्यक्ष काम करताना शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १०.०१.२०१४, अनुसार कार्यवाही करण्यात यावी.

५) शा.नि., सा.बां. विभाग, क्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमा.-२, दिनांक ०७.०७.२०१७, अनुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) सदर काम रु.१५.६१,३०,३७७/- इतक्या रकमेत पूर्ण होईल याची दक्षता घेण्यात यावी.

७) निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरु करण्यात येऊ नये.

५. उक्त खर्च हा, गृह विभाग, "मागणी क्र.बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) (११) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण साठी बांधकाम करणे (कार्यक्रम), ४०७००१५१, ५३, मोठी बांधकामे" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालून, त्यासाठी उपलब्ध केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे शासन ज्ञापन, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौसं ३३४/२०२४/इमा-२, दि. १५/०१/२०२५ अन्वये प्राप्त सहमती तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिकाम भाग पहिला, उप विभाग-पाच, अ.क्र.९, अनुसार प्रशासनिक विभागास प्राप्त अधिकारांत सक्षम प्राधिका-याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२५०२१३१७४०५८६१२९ हा आहे. हे शासन ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHETAN BALASAHEB NIKAM

Digitally signed by CHETAN BALASAHEB NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7268DE40660971F80951C66D0E657E903B378196F51A978D2A366CF5EB564C0C, cn=CHETAN BALASAHEB NIKAM
Date: 2025.02.13 17:41:49 +05'30'

**( चेतन निकम )**

**शासनाचे उप सचिव.**

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) विशेष पोलीस महानिरीक्षक, कोल्हापूर परिक्षेत्र, कोल्हापूर.
३) पोलीस अधीक्षक, पुणे (ग्रामीण).

**प्रत-**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रदेश, पुणे ["Recapitulation Sheet" च्या प्रतीसह]
२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, पुणे [ "Recapitulation Sheet" च्या प्रतीसह]
३) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
४) महा लेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
५) कार्यासन अधिकारी (इमा-२), सा.बां. विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) कार्यासन अधिकारी (अर्थसं-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) कार्यासन अधिकारी (व्यय-७/ विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) कार्यकारी अभियंता, सा.बां.(उत्तर ) विभाग, पुणे
९) निवड नस्ती (पोल-७), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.